सातारा जिल्ह्यातील फलटण तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१८०/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- ८ जानेवारी,२०१९**

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/१११/६९९२/२०१८ दि. २६/१०/२०१८.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/१४२/७४२६/२०१८ दि. ३०/११/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सातारा जिल्ह्यातील फलटण तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, सातारा यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, सातारा यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, सातारा यांचा ठराव विचारात घेऊन सातारा जिल्ह्यातील फलटण तालुक्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ट रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | तरडगांव - सासवड - घाडगेवाडी - शेरेचीवाडी ते प्रमुख जिल्हा मार्ग -९ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ११ | (०/०० ते १७/००) १७.०० कि.मी. | १७.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-८६ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | प्रमुख जिल्हा मार्ग -१० गिरवी ते दुधेबावी - वडले - पिंप्रद - राजाळे - सांगवी ते प्रमुख जिल्हा मार्ग -६ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १८ | (०/०० ते २८/००) २८.०० कि.मी. | २८.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-८७ |
| ३. | प्रस्तावित प्रमुख जिल्हा मार्ग पासून सासकल -भाडळी बु. -सोनवडी बु. - विडणी - सांगवी रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १९ | (४/०० ते २७/००) २३.०० कि.मी. | २३.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-८८ |
| ४. | प्रमुख जिल्हा मार्ग -७ ते पवारवाडी - हणमंतवाडी - मुंजवडी - राजुरी - कुरवली बु. - आंदरूड - जावली प्रमुख जिल्हा मार्ग १३ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग २१ | (०/०० ते २५/००) २५.०० कि.मी. | २५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-८९ |
| ५. | प्रमुख जिल्हा मार्ग -१३ ते बरड - निंबळक - टाकळवाडा - राजाळे प्रमुख जिल्हा मार्ग-७ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग २० | (०/५०० ते १५/००) ६.०० कि.मी. | १४.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-९० |
| | **एकूण** | | | **१०७.५०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२१ मधील सातारा जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१०७.५०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२३४९.११० + १०७.५००) म्हणजेच **२४५६.६१० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **१११.५०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (२१६१.११० - १११.५००) म्हणजेच **२०४९.६१० कि. मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०८१६४२५१२०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2019.01.08 16:47:33 +05'30'

**( स्वरूप रायपुरे )**

उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी,

महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,सातारा.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सातारा (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.